२०१००७१३१४१३२५००१

**धुळे महानगरपालिका**
**स्थायी समिती निवडीबाबत पारीत करण्यात आलेला महासभा ठराव क्र.९२, दिनांक २४.१२.२००९ अंशत: विखंडीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.धुमपा-१०१०/३/प्र.क्र.७/१०/नवि-२५**
**मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक : ९ जुलै, २०१०**

**पहा :-** १) आयुक्त, धुळे महानगरपालिका यांचे पत्र क्र.धुमपा/नगर सचिव/९/१०-११, दिनांक १७.४.२०१०.
२) धुळे महानगरपालिका महासभा ठराव क्र.९२, दिनांक २४.१२.२००९.
३) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र. धुमपा-१०१०/३/प्र.क्र.७/१०/नवि-२५ दिनांक ३०.४.२०१०.

**प्रस्तावना:-**

मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ च्या कलम ३१अ(२) मधील तरतुदीनुसार पक्षाचे तौलनिक संख्याबळ विचारात घेऊन स्थायी समितीवर सदस्यांचे नामनिर्देशन करणे आवश्यक आहे.

तथापि धुळे महानगरपालिकेच्या स्थायी समितीवर सदस्य नामनिर्देशित करण्याच्या महानगरपालिकेच्या ठराव क्र.९२, दिनांक २४.१२.२००९ अन्वये नामनिर्देशित करण्यात आलेली सदस्य संख्या ही स्थायी समितीवरील पक्षांच्या तौलनिक संख्याबळाशी सुसंगत नसल्याने उपरोक्त शासन निर्णय, दिनांक ३० एप्रिल, २०१० अन्वये स्थायी समितीवर शिवसेनेने नामनिर्देशित केलेले दोन सदस्य वगळून उर्वरित ठराव मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ४५१(१) अन्वये निलंबित करण्यात आला होता. सदर निर्णयासंदर्भात महापालिकेकडून कोणतेही अभिवेदन प्राप्त न झाल्याने सदर ठराव विखंडीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या संदर्भात शासनाने आता खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

धुळे महानगरपालिका महासभा ठराव क्र.९२, दिनांक २४.१२.२००९ अन्वये स्थायी समितीवर नामनिर्देशित करण्यात आलेल्या पक्ष / गट निहाय सदस्यांची संख्या, काही पक्ष /गट

यांच्याबाबतीत मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ मधील कलम ३१अ(२) मधील तरतुदीनुसार पक्षांच्या तौलनिक संख्याबळाशी सुसंगत नसल्याने , स्थायी समितीवर शिवसेनेने नामनिर्देशित केलेले सदस्य वगळता, उर्वरित ठराव मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ च्या कलम ४५१(३) अन्वये विखंडीत करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

**( स्मिता द. मंत्री )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) महापौर, धुळे महानगरपालिका, धुळे.
३) आयुक्त, धुळे महानगरपालिका, धुळे.
४) मा.सचिव (नवि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५) नगर विकास विभाग, नवि-२९, मंत्रालय, मुंबई (वेबसाईटवर प्रसिध्दीकरिता)
६) निवडनस्ती (नवि-२५) (२ प्रती)